**वर्कप्लॅन अंतर्गत सन २००९-१० मध्ये ऊस विकास कार्यक्रम ही केंद्र**
**<u>पुरस्कृत योजना राबविण्याकरिता निधी मुक्त करण्याबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासना**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :-उसवि १६०९/प्र.क्र. १२० /४अे,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२,**
**दिनांक : ३१ मार्च,२०१०.**

**संदर्भ:-१) शासन निर्णय, कृ.व पदुम विभाग, क्र. उसवि १६०९/प्र.क्र. १२० /४अे,**
**दि. २९ जुलै,२००९ व दि. ९ मार्च,२०१०.**
**२) शासन निर्णय, कृ.व पदुम विभाग, क्र. पुनर्वि -१००९ /भाग-१० /**
**(प्र.क्र. १९४/०९)/ २-अे, दि. ३१ मार्च, २०१०**

**<u>शासन निर्णय</u> :-** केंद्र शासनाने सन २००९-१० मध्ये केंद्र पुरस्कृत ऊस विकास कार्यक्रम राबविण्याकरिता रु.१९७१.८० लाखाच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता दिली आहे. यामध्ये केंद्र व राज्य हिस्सा ७५:२५ नुसार अनुक्रमे रु.१४७८.८५ लाख (रुपये चौदा कोटी अठ्ठयाहत्तर लाख पंचाऐंशी हजार फक्त) व रु.४९२.८५ लाख (रुपये चार कोटी ब्याण्णव लाख पंचाऐंशी हजार फक्त) असा आहे. केंद्र शासनाची मान्यता लक्षात घेवून केंद्र पुरस्कृत ऊस विकास कार्यक्रम राबविण्याकरिता रु. १००६.७४ लाखाच्या कार्यक्रमास संदर्भाधिन अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. या व्यतिरिक्त सन २००९-१० करिता केंद्र हिश्श्यासाठी आवश्यक रु.४७२.११ लाख (रु. चार कोटी बहात्तर लाख एकरा हजार फक्त ) एवढा अ.क्र. २ येथील शासन निर्णयान्वये पुनर्विनियोजनाने उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी मुक्त करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर निधी खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून तो सन २००९-१० साठी अर्थसंकल्पित केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक डी-३
२४०१ - पीक संवर्धन,
१०८ वाणिज्यिक पिके
(०२) (०८) विदर्भ, मराठवाडा व खानदेश भागातील ऊस विकास कार्यक्रम ,
(केंद्र पुरस्कृत ) (२४०१ ४०५१) ३३ अर्थसहाय्य

२. सदर योजना शासन निर्णय, दि.२९ जुलै, २००९ मधील अ.क्र.२ व ३ मध्ये नमूद केलेल्या शासन निर्णयातील अटींनुसार राबविण्यात यावी.

३. वरील मंजूर निधी खर्च करण्यास संचालक, (विस्तार व प्रशिक्षण) कृषि आयुक्तालय,पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच या निधीचे जिल्हानिहाय वितरण संबंधित जिल्हयांना करण्यास संचालक, (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

४.	केद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनाची काटेकोर अंमलबजावणी होईल याची दक्षता सर्व संबंधितांनी घ्यावी . या योजनेच्या अंमलबजावणीचा आढावा संचालक, (विस्तार व प्रशिक्षण),कृषि आयुक्तालय,पुणे यांनी वेळोवेळी घ्यावा व याबाबतचा मासिक प्रगती अहवाल विहित नमुन्यात न चुकता  शासनास पुढील महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करावा. तसेच भौतिक व आर्थिक साध्य याचा तिमाही अहवाल केंद्र शासनास सादर करावा.

५.	हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ८८/१०/व्यय-१, दिनांक ३१ मार्च,२०१० अन्वये दिलेल्या मंजूरीनुसार व प्रधान सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

६	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००४१७१८२८१९००१  असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**(वि.मा.बिवलकर)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.**

प्रति,

आयुक्त कृषि, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
संचालक, (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे
सर्व संचालक / सहसंचालक, कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे-१
साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे,
विभागीय आयुक्त (सर्व)
जिल्हाधिकारी, (सर्व)
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
व्यवस्थापकीय संचालक, कृषि उद्योग विकास महामंडळ मर्यादित, आरे, दुग्ध कॉलनी गोरेगाव (पूर्व), मुंबई-६५
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, शास्त्रीनगर, अकोला.
सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला,मंत्रालयासमोर, मुंबई
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ /२, मुंबई / नागपूर
नियोजन विभाग (कार्यासन - १४३१ / कार्यासन - १४४४), मंत्रालय, मुंबई - ३२
सामाजिक न्याय, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
वित्त विभाग (व्यय-१/अर्थसं १३),मंत्रालय, मुंबई-३२,
सर्व सह सचिव / उपसचिव / अवर सचिव, कृषि व पदुम विभाग,  (कृषि व फलोत्पादन प्रभाग)
वसंतदादा सहकारी संस्था,मांजरी, ता.हवेली, जि.पुणे.
मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (कृषि ) यांचे खाजगी सचिव////   निवडनस्ती